राज्यातील सागर तटीय जिल्हयांकरिता कांदळवनाचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी "तक्रार निवारण यंत्रणा" स्थापित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-३०/२०१८/प्र.क्र.५९२/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १९ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ :-**

१) मा.उच्च न्यायालयातील जनहित याचिका क्र. ८७/२००६ मधील दिनांक १७ सप्टेंबर, २०१८ रोजीचा न्यायनिर्णय.
२) महसूल व वन विभागाचा शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०१५/अनौ.३०/प्र.क्र. ४६२/फ-३, दिनांक १६/१०/२०१८.
३) समक्रमांकीत शासन निर्णय दिनांक १५/१२/२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्याला ७२० कि.मी. लांबीच्या सागरी किनाऱ्याचे वरदान लाभले असून या सागरी किनाऱ्यालगत व खाडीक्षेत्रात पर्यावरणीय परिसंस्थेला लाभकारक अशा सुमारे २० कांदळवन प्रजाती आढळतात. कांदळवनामुळे त्सुनामी, वादळे इ. नैसर्गिक आपत्तींपासून सागरी किनाऱ्यांचे संरक्षण होते, कांदळवन हे अनेक प्राणी व वनस्पती प्रजातींची आश्रयस्थान आहे. तसेच मत्स्य व्यवसाय व कार्बन स्थिरीकरणांमध्ये कांदळवनांचे मोठे योगदान आहे. भारतीय सर्वेक्षण संस्थेच्या २०१७ चे अहवालाप्रमाणे राज्यातील कांदळवनांचे एकूण क्षेत्र ३०४ चौ.कि.मी. असून ते राज्यातील ७ किनारी जिल्ह्यात विखुरलेले आहे. अलिकडच्या काळात कांदळवन आच्छादनामध्ये जरी वाढ होत असली तरी मानवी हस्तक्षेपामुळे या महत्वाच्या नैसर्गिक स्रोतावरील ताण कायम आहे. त्यामुळे कांदळवन प्रजातींचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी योग्य उपाययोजना करणे आवश्यक आहे.

जनहित याचिका क्र. ८७/२००६ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिनांक १७/०९/२०१८ रोजीच्या आदेशान्वये महाराष्ट्रातील कांदळवनांचे संरक्षण व संवर्धनाच्या अनुषंगाने आदेश दिले आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या सदर आदेशाच्या अनुषंगाने संदर्भ क्र.२ अन्वये राज्यातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदूर्ग या सागरतटीय जिल्हयांकरिता कांदळवनांचे संरक्षण व संवर्धन करण्यासाठी विभागीय आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली सनियंत्रण समिती गठीत करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे सदर सनियंत्रण समितीच्या कामाचा आढावा घेण्यासाठी संदर्भ क्र.३ अन्वये अपर मुख्य सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयातील परिच्छेद ८५ (इ) व (एफ) मध्ये कांदळवनांचा ऱ्हास किंवा तोड करणाऱ्या घटनांबाबत नागरिकांना तक्रारी दाखल करण्यासाठी व सदर तक्रारींचे निवारण करण्यासाठी "तक्रार निवारण यंत्रणा" स्थापित करण्याचे आदेशित केले आहे. त्या अनुषंगाने "तक्रार निवारण यंत्रणा" स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्यातील कांदळवनांचा ऱ्हास /तोड करणाऱ्या/ हानी पोहचवणाऱ्या घटनांबाबत नागरिकांना तक्रारी दाखल करण्यासाठी व सदर तक्रारींचे निवारण करण्याच्या अनुषंगाने “तक्रार निवारण यंत्रणा” स्थापित करण्यात येत आहे.

**तक्रार निवारण यंत्रणा व तिची कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील :-**

१. नागरिकांना राज्यातील कांदळवनांचा ऱ्हास /तोड करणाऱ्या/ हानी पोहचविणाऱ्या घटनांबाबत त्यांच्या तक्रारी www.konkanmangroves.com या स्वतंत्र वेबसाईटवर किंवा १९२६ या टोल फ्री क्रमांकावर किंवा konkanmangroves@gmail.com या ई-मेल द्वारे दाखल / नोंदविता येतील.

२. उपरोक्त स्वतंत्र वेबसाईट/टोल फ्री क्रमांक/ ई-मेलवर प्राप्त तक्रारी, कांदळवन व संवर्धन संनियंत्रण समिती तात्काळ जिल्हास्तरीय उपसमितीकडे वर्ग करील. तक्रारदारांच्या विनंतीनुसार त्यांची ओळख गोपनिय ठेवली जाईल.

३. विभागीय आयुक्त, कोकण यांनी स्थापित केलेल्या जिल्हा व तालुकास्तरावरील अनुक्रमे जिल्हाधिकारी व उपविभागीय अधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समित्यांनी दर महिन्यातून किमान एकदा बैठक घेवून कांदळवन ऱ्हासाबाबतच्या तक्रारींचे निवारण करावे व कांदळवनांचे पुर्ननिर्माण करण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी.

४. जिल्हास्तरीय उप समित्या त्यांच्या कार्यकक्षेतील प्राप्त तक्रारींचे त्यांच्या स्तरावरच निवारण करतील व त्याचा अहवाल संनियंत्रण समितीकडे सादर करतील. तक्रारदाराचे उपसमितीच्या निर्णयाने समाधान न झाल्यास तक्रारदार संनियंत्रण समितीकडे दाद मागू शकतील.

५. सागरतटीय सात जिल्ह्यामध्ये तक्रारीच्या निवारणासाठी प्रत्येकी ३ नोडल अधिकारी नेमले जातील. त्यामध्ये महसूल प्रशासनातील १ अधिकारी (निवासी उपजिल्हाधिकारी/उपजिल्हाधिकारी दर्जाचा), पोलिस प्रशासनातील १ अधिकारी (पोलिस उप अधिक्षक दर्जाचा) व वन विभागाचा १ अधिकारी (सहाय्यक वनसंरक्षक दर्जाचा) असावा. संबंधित जिल्हाधिकारी, पोलिस अधीक्षक व उपवनसंक्षक यांनी सदर नोडल अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन करावे.

६. संबंधित नोडल अधिकारी (महसूल/पोलिस/वनविभाग) यांनी जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय समित्यांच्या संपर्कात राहून त्यांच्याकडून तक्रारीच्या अनुषंगाने ४८ तासांमध्ये स्थळ पहाणी केली जाईल व तक्रारींमध्ये तथ्य आढळल्यास गुन्हा नोंदविण्याची कार्यवाही केली जाईल, याची दक्षता घ्यावी. स्थळपहाणी करणाऱ्या अधिकाऱ्यांना संरक्षण पुरविणे ही पोलिस प्रशासनाच्या नोडल अधिकारी (पोलिस उपअधिक्षक) यांची जबाबदारी राहील. तक्रारदार त्यांची ओळख गोपनिय ठेऊन इच्छित नसेल तर शक्यतो स्थळपहाणी तक्रारदाराच्या उपस्थितीत करण्यात यावी..

**अ) राखीव वन / संरक्षित वन म्हणून अधिसूचित नसलेल्या (खाजगी / शासकीय-निमशासकीय / स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या ताब्यात असलेल्या ) कांदळवन क्षेत्राच्या तक्रारींबाबत:-**

I. संबंधित कांदळवन क्षेत्र ज्या संस्थेच्या / यंत्रणेच्या ताब्यात आहे त्या यंत्रणेने तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करुन गुन्हा नोंद करण्याची कार्यवाही करावी. खाजगी कांदळवन क्षेत्राबाबत तक्रारीच्या अनुषंगाने पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत सक्षम प्राधिकाऱ्याने (महसूल यंत्रणेने) गुन्हा नोंद करण्याची कार्यवाही करावी.

II. गुन्हयाची नोंद झाल्यानंतर पोलिस यंत्रणेने एक महिन्याच्या आंत तपास पूर्ण करून तपासादरम्यान प्राप्त् झालेले पूरावे व दस्तऐवजासह दोषारोप पत्र / तक्रार, पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत दखल घेण्यास सक्षम असलेल्या अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करावी. (महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाचे विभागीय अधिकारी अथवा संबंधित जिल्ह्याचे उपविभागीय न्यायदंडाधिकारी)

III. सक्षम अधिकाऱ्याने (महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळाचे विभागीय अधिकारी अथवा संबंधित जिल्ह्याचे उपविभागीय न्यायदंडाधिकारी) २ महिन्याचे कालावधीत पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत कारवाई साठी मा. न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करावे.

**ब) राखीव / संरक्षित वन म्हणून घोषित झालेल्या कांदळवन क्षेत्राबाबतच्या तक्रारींबाबत:-**

संबंधित वन अधिकाऱ्याने तपास पूर्ण करुन वन अधिनियमांतर्गत कारवाईसाठी ३ महिन्यांच्या आंत मा.न्यायालयात दोषारोपपत्र दाखल करावे.

७. सनियंत्रण समिती, जिल्हा व तालुकास्तरीय समित्या, नोडल अधिकारी व तपास अधिकारी यांनी प्राप्त झालेल्या तक्रारी व त्याबाबत केलेंल्या कार्यवाहीच्या आवश्यक नोंदी नोंदवही मध्ये ठेवाव्यात.

८. तक्रार प्राप्त होताच संबंधित अधिकाऱ्याने तक्रारदारास पोहोच द्यावी. तक्रारीबाबत करणेत येत असलेल्या कारवाईच्या प्रगतीबाबत तक्रारदारास माहिती देणेत यावी. संनियंत्रण समिती/ उप समितीकडे तपास अधिकाऱ्याकडून अहवाल प्राप्त होताच त्याबाबत तक्रारदारास कळविणेची जबाबरदारी संबंधित उपसमिती/ संनियंत्रण समितीची राहील. तक्रारीचे अनुषंगाने पुढील कार्यवाहीबाबत म्हणजे दोषारोपपत्र दाखल करणे, अतिक्रमण निष्कासन, आरोपींची अटक इत्यादी बाबत तक्रारदारास वेळोवेळी कळविण्यात यावे तसेच तक्रारदारास प्रगतीची माहिती मिळण्याचे दृष्टीने प्रगतीचा तपशिल वबसाईटवर देण्यात यावा.

९. “तक्रार निवारण यंत्रणा” स्थापनेबाबतची माहिती किनारी जिल्ह्यातील जिल्हाधिकारी, उपविभागीय अधिकारी, तहसिलदार, कांदळवन कक्ष, संबंधित उप वनसंरक्षक व वन परिक्षेत्र अधिकारी यांचे कार्यालयात तसेच महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, महानगरपालिका, नगरपालिका यांचे कार्यालयात ठळकपणे प्रसिध्द करणेत यावी, किनारी जिल्ह्यामध्ये चांगले वितरण असलेल्या वर्तमान पत्रांमध्ये तक्रार निवारण यंत्रणेबाबतची तपशिलवार माहिती ठराविक कालावधीने व किमान सहा महिन्यातून एकदा प्रसिध्द करणेत यावी.

शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१९१५४००५८२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.12.19 15:47:41 +05'30'

( वीरेंद्र तिवारी )
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
४) सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
८) अपर मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम मुंबई.
९) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, कोंकण.
१०) आयुक्त, महानगर पालिका बृहन्मुंबई / ठाणे / कल्याण-डोंबिवली / मिरा-भाईदंर/ वसई-विरार / नवी मुंबई / पनवेल/ भिवंडी-निजामपूर / उल्हासनगर.
११) पोलीस आयुक्त, मुंबई / ठाणे/ नवी मुंबई.
१२) जिल्हाधिकारी, मुंबई / मुंबई उपनगर / ठाणे/ रायगड / पालघर / रत्नागिरी / सिंधुदूर्ग.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रक मंडळ, मुंबई.
१४) मुख्य महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (MMRDA)
१५) व्यवस्थापकीय संचालक,शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (CIDCO).
१६) व्यवस्थापकीय संचालयक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (MHADA)
१७) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ (MIDC) यांचे प्रतिनिधी.
१८) सदस्य सचिव, महाराष्ट्र सागर तटीय क्षेत्र व्यवस्थापन प्राधिकरण (MCZMA)
१९) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे / कोल्हापूर.
२०) जिल्हा पोलीस अधिक्षक, ठाणे (ग्रामीण) / रायगड / पालघर / रत्नागिरी / सिंधुदूर्ग.
२१) उप वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
२२) उप वनसंरक्षक, ठाणे, डहाणू, जव्हार, रोहा, अलिबाग, शहापूर, सावंतवाडी.
२३) विभागीय वन अधिकारी, चिपळून स्थित रत्नागिरी.
२४) विभागीय वन अधिकारी, मुंबई कांदळवन संवर्धन घटक
२४) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण.
२५) नवी मुंबई एन्व्हारमेंट प्रिझर्वेशन सोसायटी.
२६) बॉम्बे एन्व्हारमेंट ॲक्शन ग्रूप.
२७) वनशक्ती (NGO).
२८) महाराष्ट्र मच्छीमार कृती संघ.
२९) संचालक, बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी.